केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण उपअभियानांतर्गत सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र तसेच राज्य हिस्सा निधी वितरीत करणेबाबत.
( लेखाशिर्ष २४०१A४५९ (केंद्र हिस्सा) व २४०१A४४१ (राज्य हिस्सा) )

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१८ / प्र.क्र.११ / कार्यासन.६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: - ७ जूलै, २०१८.

वाचा -

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८ /प्र.क्र.६९ / अर्थ-३, दि. ०२.०४.२०१८.
२) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र. कृयांयो- ०६१८/ प्र. क्र.२०२ / १४-अे.

**शासन निर्णय-**

केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजना, कृषि यांत्रिकीकरण उप अभियानांतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी लेखाशिर्ष मागणी क्र. टी-५, २४०१, पीक संवर्धन, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना अंतर्गत योजना, (०१) (११) कृषि उन्नती योजना-कृषी यांत्रिकीकरण उपअभियान, ( २४०१ A४५९) - ३३ अर्थसहाय्य (केंद्र हिस्सा) लेखाशिर्षाखाली रु.४८८.०३ लाख इतका निधी तर राज्य हिश्श्याकरिता (०१) (१०) कृषि उन्नती योजना-कृषी विषयक यांत्रिकीकरण उपअभियान, (२४०१ A४४१ ) - ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली रु. ३२५.३५ लाख इतका निधी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

२. कृषि व पदुम विभागाच्या वाचा क्र. २ येथील प्रस्तावानुसार केंद्र शासनाने उपरोक्त योजनेंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता रु.१००.०० लाख इतका निधी वितरीत केलेला आहे. यानुषंगाने सदर योजनेच्या केंद्र हिश्श्याकरीता **(२४०१ A ४५९) - ३३ अर्थसहाय्य (केंद्र हिस्सा ) या लेखाशिर्षाखाली रु. १००.००लाख (रुपये एक कोटी फक्त )** इतका निधी तर समरुप राज्य हिश्श्याकरीता **(२४०१ A ४४१ ) - ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली रु. ६६.६७ लाख (रुपये सहासष्ठ लाख सदुसष्ठ हजार फक्त )** इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३२६/ अर्थोपाय, दि.२०/०६/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०७१२१४२४३०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: cn=Ravindra Digambarrao Aute, o=Tribal Development Department, ou=Government of Maharashtra, email=rajendra.aute@nic.in, c=IN
Date: 2018.07.07 12:39:33 +05'30'

**रविंद्र दि.औटे**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त( कृषि) , महाराष्ट्र राज्य,पुणे.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.